**सन २०१७-१८ मध्ये "अधिकारी, क्षेत्रीय कर्मचारी तसेच आत्मा समिती सदस्यांच्या प्रशिक्षणाचा व क्षमताबांधणीचा कार्यक्रम वनामती व रामेती येथे राबविण्यासाठी निधीस मान्यता.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः कृविका २०१७/प्र.क्र. ८/३-अे,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२.
**दिनांक : ९ जून, २०१७**

वाचा- १) कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र.संकीर्ण २०१६/ प्र.क्र.२७ /३-अे, दि. २७.५.२०१६
२) कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र.संकीर्ण २०१६/ प्र.क्र.२७ /३-अे, दि. २४.१०.२०१६
३) कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र.संकीर्ण २०१६/ प्र.क्र.२७ /३-अे, दि. १७.३.२०१७
४) संचालक , आत्मा यांचे पत्र क्र. कृआ / कृउसं (प्रशि) / वि प्र-५/ मान्यता /१३२ /२०१७, दि. २०.५.२०१७

**प्रस्तावना :-**

सन २०१६-१७ मध्ये राज्यात अधिकारी, क्षेत्रिय कर्मचारी तसेच आत्मा समिती सदस्यांच्या प्रशिक्षणांचा व क्षमताबांधणीचा कार्यक्रम कार्यक्रम वनामती व रामेती येथे राबविणे या योजनेकरिता राष्ट्रीय कृषि विकास ( रा.कृ.वि.) योजनेमधून रु. ५९८.७८ लक्ष इतका निधी उपलब्ध करुन देण्यास शासन निर्णय दि. १७.३.२०१७ अन्वये मान्यता देण्यात आली होती तसेच सन २०१६-१७ च्या उर्वरीत कालावधीकरिताच्या शासन निर्णय दि. १७.३ २०१७ अन्वये रु.१.०० कोटी इतका निधी उपलब्ध करुन देण्यात आला होता. यासंदर्भात, या योजनेसाठी सन २०१६-१७ मधील शिल्लक रु.४९९.०० लक्ष एवढा निधी शिल्लक आहे. दरम्यानच्या काळात रु.१०२.२५ लक्ष निधीचे कार्यक्रम वनामती व रामेती या प्रशिक्षण संस्थांच्या संचित निधीतूनही पार पाडण्यात आले. तत्संबंधात संचित निधीतील रु.१०२.२५ लक्ष चे समायोजन करण्यासाठी व उर्वरित रु.३९६.७५ लक्ष एवढा निधी सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात खर्च करण्यास मान्यता देण्याची विनंती करण्यात आली होती. सन २०१७-१८ या चालु वित्तीय वर्षात रा.कृ.वि. योजनेअंतर्गत नव्याने निधी उपलब्ध करुन देण्यात येणार नाही. तदनुषंगाने शासनाने पुढील निर्णय घेतला आहे.

## शासन निर्णय :-

**अ)** सन २०१६-१७ मधील प्रशिक्षण कार्यक्रमांसाठी वनामती व रामेती संस्थांनी त्यांच्या संचित निधीतुन खर्च केलेला रु.१०२.२५ लक्ष एवढा निधी सन २०१६-१७ मधील रा.कृ.वि योजनेमधून मंजुर रु.५९९.०० लक्ष निधीपैकी शिल्लक रु.४९९.०० लक्ष निधीतुन वनामती व रामेती संस्थांच्या संचित निधीत समायोजित करण्यासाठी उपलब्ध करून देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**ब)** वरील क्र.१) येथील समायोजनानंतर अधिकारी, क्षेत्रीय कर्मचारी तसेच आत्मा समिती सदस्यांच्या प्रशिक्षणाचा व क्षमताबांधणीचा कार्यक्रम वनामती व रामेती येथे राबविणे या योजनेसाठी सन २०१६-१७ मधील उर्वरित शिल्लक रु.३९६.७५ लक्ष एवढा निधी सन २०१७-१८ मधील प्रशिक्षण कार्यक्रमांसाठी खर्च करण्यास खालील अटी व शर्तींच्या राहून मान्यता देण्यात येत आहे.

**१)** प्रस्तुत योजनेअंतर्गत दिलेल्या मार्गदर्शक सूचना, मार्गदर्शक तत्वे तसेच शासनाचे प्रचलित नियम व अटी यानुसार विविध प्रशिक्षण कार्यक्रम आयोजित करणे याकरिता संबंधित अधिकाऱ्यांना आवश्यक त्या सूचना संचालक, आत्मा यांनी निर्गमित कराव्यात.

**२)** सदर प्रशिक्षण कार्यक्रमामध्ये वनामती स्तरावर अधिका-यांच्या तसेच आत्मा नियामक मंडळाच्या (GB) सदस्यांच्या (अधिकारी व शेतकरी प्रतिनिधी ) प्रशिक्षणाचा समावेश राहील. तसेच रामेती स्तरावरील प्रशिक्षण कार्यक्रमामध्ये क्षेत्रिय अधिकारी व कर्मचारी, नवनियुक्त कृषि सेवक, आत्मा जिल्हास्तरीय शेतकरी सल्ला समिती सदस्य (DFAC) व आत्मा तालुकास्तरीय शेतकरी सल्ला समिती सदस्य ( BFAC ) यांच्या प्रशिक्षणाचा समावेश राहील.

**३)** आत्मा तालुक्यातील शेतकरी सल्ला समिती सदस्य (BFAC) यांच्या प्रशिक्षणाचा कार्यक्रम रामेती स्तरावर राबविणे शक्य होत नसल्यास सदरच्या प्रशिक्षणांचा कार्यक्रम जिल्हा प्रशिक्षण केंद्र ( DTC), कृषि चिकित्सालये इ. ठिकाणी संबंधित रामेती यांच्या मार्फत आवश्यकतेनुसार राबविण्यात यावा.

**४)** वरीलप्रमाणे विविध प्रशिक्षणांचा कार्यक्रम संचालक, वनामती यांनी सर्व संबंधित प्राचार्य, रामेती यांच्या समन्वयाने राबवावा.

**५)** संचालक, वनामती, नागपूर यांनी सन २०१७-१८ च्या प्रशिक्षण कॅलेडरबाबत कृषि आयुक्तालयास पाठविलेल्या गोषवाऱ्यातील बाबींची पूर्तता करण्याची संचालक, आत्मा यांनी दक्षता घ्यावी.

**६)** या सर्व प्रशिक्षणांचे कॅलेंडर प्रशिक्षण मोडयुलसह तयार करुन त्यास आयुक्त, कृषि यांची मान्यता घेण्याची कार्यवाही संचालक, वनामती यांनी करावी.

**७)** या योजनेसाठी राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत निधी उपलब्ध करुन देण्यात येत असल्याने सन २०१७-१८ मध्ये निधी अखर्चीत राहणार नाही, याची सर्व संबंधित यंत्रणांनी दक्षता घ्यावी.

**८)** सदर योजना राबविण्यासाठी झालेल्या खर्चाची उपयोगिता प्रमाणपत्रे संचालक, आत्मा यांनी शासनास वेळोवेळी सादर करावीत.

सदर योजनेअंतर्गत निधी विनियोगासाठी संचालक (आत्मा), यांना नियंत्रण अधिकारी म्हणून तर सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०६०९१४४९०२१५०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vikram Nivrutti Dhamal

Digitally signed by Vikram Nivrutti Dhamal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=10d36944a4b86eab516b1b70183709c5fb570cfdf5a52755adfef51ed380b836, cn=Vikram Nivrutti Dhamal
Date: 2017.06.09 14:46:26 +05'30'

**( विक्रम ढमाळ )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. संचालक ( आत्मा ), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
२. संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,नागपूर

**प्रत-**

१. मा.मंत्री ( कृषि ) यांचे खाजगी सचिव
२. मा.राज्यमंत्री ( कृषि ) यांचे खाजगी सचिव
३. आयुक्त ( कृषि ), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
४. संचालक ( विस्तार व प्रशिक्षण ), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
५. सर्व संचालक / सर्व सहसंचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
६. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा), मुंबई / नागपूर,
७. सर्व विभागीय कृषी सह संचालक,
८. कृषि सह संचालक ( विस्तार), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
९. सर्व जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी,
१०. प्राचार्य, सर्व रामेती, महाराष्ट्र राज्य, पुणे ( पुणे, कोल्हापूर, औरंगाबाद, अमरावती, नाशिक, नागपूर व खोपोली )
११. सर्व तालुका कृषि अधिकारी,
१२. सहसंचालक, लेखा व कोषागारे (संगणक कक्ष), नवीन प्रशासन भवन, मुंबई,
१३. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१४. वित्त विभाग (व्यय-१ / अर्थसंकल्प-१२), मंत्रालय, मुंबई-३२
१५. नियोजन विभाग का.१४३२, मंत्रालय, मुंबई-३२
१६. सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन १२ अे, मंत्रालय, मुंबई-३२
१७. सर्व सहसचिव / उप सचिव ,कृषि व दुम विभाग,मंत्रालय,मुंबई
१८. अवर सचिव, राकृवियो कक्ष, कार्यासन २-अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
२१. निवड नस्ती.३अे